प्रवासभत्ता तरतूदींना सुधारणा.
विभागीय चौकशी.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक : प्रवास-1095/प्र.क्र.30/सेवा-5,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 31 ऑक्टोबर, 1998.

पहा : 1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक.सीडीआर-1089/1027/प्र.क्र.38/90/अकरा, दिनांक 3 नोव्हेंबर, 1990.

2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीडीआर-1091/653/42/91/अकरा, दिनांक 21 ऑक्टोबर, 1993.

## शासन निर्णय

मुंबई नागरी सेवा नियम, 1959 च्या खंड 1 च्या नियम 536 मधील प्रवासभत्ता विषयक तरतुदींनुसार, विभागीय चौकशी प्रकरणात, शासकीय कर्मचा-याला सेवा कालावधीत प्रवासभत्ता अनुज्ञेय आहे. परंतु अशा कर्मचा-याला हा भत्ता सेवा निवृत्तीनंतरही अनुज्ञेय असण्याबाबतची विनिर्दिष्ट तरतूद मुंबई नागरी सेवा नियमामध्ये करण्यात आलेली नाही. तसेच विभागीय चौकशी प्रकरणी सादरकर्ता अधिकारी व बचाव सहायकाची मदत अपचारी कर्मचा-यास घ्यावयाची असल्यास बचाव सहायकास प्रवासभत्ता देण्याची तरतूद देखील अद्यापि करण्यात आलेली नाही. विभागीय चौकशीच्या संदर्भात उपस्थित राहण्यासाठी सादरकर्ता अधिका-यास, सेवा निवृत्त कर्मचा-यास तसेच बचाव सहायकास प्रवासभत्ता अनुज्ञेय ठरविण्याचा प्रश्न काही काळ शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन आता असे आदेश देत आहे की, अशा प्रकरणी प्रवासभत्ता पुढे नमूद केल्याप्रमाणे अनुज्ञेय राहील.-

1) विभागीय चौकशी प्रकरणी सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-यास प्रवासभत्ता :

| | |
|---|---|
| (अ) सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-याच्या स्वतः वरील विभागीय चौकशी प्रकरणी चौकशी अधिका-यासमोर उपस्थित होण्यासाठी. | सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-याने ज्या ठिकाणाकरिता सेवानिवृत्ती नंतरची कायम वास्तव्यासाठीची प्रवास सवलत उपभोगली आहे ते ठिकाण किंवा ज्या ठिकाणी (बँक/कोषागार) तो आपले सेवानिवृत्ती वेतन घेत आहे ते ठिकाण यापैकी जवळचे ठिकाण ते चौकशीचे ठिकाण व परत यासाठी मुंबई नागरी सेवा नियम, 1959 खंड-2 परिशिष्ट 42(अ) विभाग-1 मधील नियम 1(3) खालील तरतुदीप्रमाणे प्रवासभत्ता अनुज्ञेय राहील. सेवा-निवृत्त कर्मचारी या ठिकाणाव्यतिरिक्त इतर ठिकाणी वास्तव्यास असल्यास प्रत्यक्ष प्रवासखर्च किंवा वरीलप्रमाणे अनुज्ञेय होणारा प्रवासखर्च यापैकी कमी असेल तेवढा खर्च अनुज्ञेय राहील. |
| (ब) सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-याच्या स्वतः वरील विभागीय चौकशी प्रकरणात त्याच्या चौकशी अधि-का-यासमोर प्रकरण सादर करताना संबंधित कागदपत्रांचे निरीक्षण करण्यासाठी. | सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-याला स्वतः वरील विभागीय चौकशी प्रकरणात, त्याचे बचाव निवेदन तयार करण्यासाठी संबंधित कार्यालयीन कागदपत्रांचे निरीक्षण करणे आवश्यक असल्याचे व मूळ कागदपत्र अपचारी सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-याच्या सेवा कालावधीतील शेवटच्या मुख्यालयी पाठविणे किंवा त्याच्या प्रती काढून पाठविणे शक्य नसल्याबाबतचे नियंत्रक प्राधिका-याच्या प्रमाणपत्राच्या व आगाऊ परवानगीच्या अधीन राहून अशा सेवानिवृत्त कर्मचा-याला फक्त एकदाच, मुंबई नागरी सेवा नियम, 1959 खंड 2 परिशिष्ट 42(अ) विभाग-1 मधील नियम 1(3) खालील तरतुदीप्रमाणे प्रवासखर्च अनुज्ञेय राहील. |

2) विभागीय चौकशी प्रकरणी सादरकर्ता अधिकारी बचाव सहायकास प्रवासभत्ता :

| | |
|---|---|
| (अ) चौकशी अधिका-यासमोर प्रकरण सादर करण्यास उपस्थित होण्यासाठी. (अपचारी कर्मचा-याच्याविरुद्ध साक्ष देण्यासह) | 1) शासकीय कर्मचारी असणा-या सादरकर्ता अधिका-यास/बचाव सहायकास, दौ-यावर असताना देय होणारा प्रवासभत्ता या प्रकरणी अनुज्ञेय राहील.<br>2) बचाव सहाय्यक जर सेवानिवृत्त शासकीय कर्मचारी असेल तर त्यास मुंबई नागरी सेवा नियम, 1959 खंड 2. परिशिष्ट 42(अ) विभाग-1 मधील नियम 1(3) खालील तरतुदीप्रमाणे प्रवासखर्च अनुज्ञेय राहील. |
| (ब) विभागीय चौकशी प्रकरणाशी संबंधित कागदपत्रांचे निरीक्षण करण्यासाठी. | 1) बचाव सहाय्यक जर शासकीय कर्मचारी असेल तर त्यास दौ-यावर असताना देय होणारा प्रवास भत्ता अनुज्ञेय राहील.<br>2) बचाव सहाय्यक सेवानिवृत्त शासकीय कर्मचारी असेल तर त्यास मुंबई नागरी सेवा नियम, 1959 खंड 2 परिशिष्ट 42(अ) विभाग-1 मधील नियम 1(3) खालील तरतुदीप्रमाणे प्रवास खर्च अनुज्ञेय राहील. |

बचाव सहायकास, नियंत्रक प्राधिका-यांच्या आगाऊ लेखी परवानगीच्या अधीन राहून वरीलप्रमाणे प्रवासभत्ता अनुज्ञेय करण्यात यावा. परंतु वरील 2(ब) बाबत विभागीय चौकशी प्रकरणाशी संबंधित कागदपत्रांचे निरीक्षण करण्यासाठी, मूळ कागदपत्रे पाठविणे किंवा आवश्यक कागदपत्रांच्या प्रती काढून पाठविणे शक्य नसल्याबाबतचे संबंधित कार्यालय प्रमुखांचे प्रमाणपत्र घेऊन ते नियंत्रक प्राधिका-यास देणे याबाबत आवश्यक राहील.

अनुपस्थितीच्या कालावधीचे विनियमन.

निलंबनाधिन नसलेल्या, शासकीय कर्मचा-यास जाण्या-येण्यासाठी लागलेला कालावधी अधिक चौकशी अधिका-या-समोर उपस्थितीचा/कागदपत्रांचे निरिक्षणासाठी लागलेला/आवश्यक असलेला कमीत कमी कालावधी हा कालावधी कर्तव्य कालावधी मानला जावा. परंतु शासकीय कर्मचारी रजेवर असताना परस्पर चौकशी अधिका-यासमोर उपस्थित होत असल्यास, कर्मचा-याला कामावर परत बोलावण्यात आले असे मानले जाऊ नये तर हा सर्व कालावधी रजेचा भाग मानून विनियमित करण्यात यावा. परंतु हा कालावधी विशेष रजा म्हणून समजण्यात येऊ नये.

2. शासन असेही आदेश देत आहे की, विभागीय चौकशी प्रकरणात बचाव सहायक घेण्याची परवानगी, विहित अटींच्या अधीन राहून दिलेली असल्याने शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : सीडीआर-1089/1027/प्र.क्र.38/90/अकरा, दिनांक 3 नोव्हेंबर, 1990 व शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीडीआर-1091/653/42/91/अकरा, दिनांक 21 ऑक्टोबर, 1993 मधील आदेशाच्या व त्या अनुषंगाने वेळोवेळी निर्गमित होणा-या आदेशांच्या अधीन राहून या प्रकरणी प्रवासभत्ता/प्रवासखर्च अनुज्ञेय ठरविला जावा.

3. सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-यास त्याच्या स्वतः वरील चौकशी प्रकरणी व सादरकर्ता अधिकारी, तसेच बचाव सहायकांना इतरांच्या विभागीय चौकशी प्रकरणी हा प्रवासभत्ता/प्रवासखर्च ज्या कार्यालयाशी असा कर्मचारी संबंधित होता किंवा संबंधित आहे, त्या कार्यालयाने प्रदान करावा, असे करताना या कार्यालयांनी प्रवासभत्ता/प्रवासखर्च अनुज्ञेय ठरवितांना आवश्यक असलेल्या सर्व बाबींची तत्पूर्वी पूर्तता करुन घ्यावी.

4. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

5. मुंबई नागरी सेवा नियम, 1959 मधील संबंधित तरतुदी या आदेशाच्या मर्यादेपर्यंत दुरुस्त करण्यात आल्या आहेत असे समजले जावे. ह्या नियमांना औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
उप सचिव, वित्त विभाग.

एच-1001(5,000+20-11-98)1अ

प्रति,

महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,

महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,

महालेखापाल-1 (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,

महालेखापाल-2 (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

मंत्रालयातील सर्व विभाग,

सर्व विभागीय आयुक्त,

मंत्रालयातील सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,

* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,

वित्त विभागातील सर्व कार्यासने,

निवड नस्ती, कार्यासन सेवा-5.

---

* पत्राने.